पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी, पदाधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान इमारत बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

## महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०२३/प्र.क्र.२६३/बांध-४
५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन
फोर्ट, मंत्रालय, मुंबई. ४०० ००१
तारीख: १९ ऑगस्ट, २०२४

वाचा -

१) **ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः** पसई-२०१६/प्र.क्र.७९/पंरा-७, दिनांक २९ मार्च, २०१६.
२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्रमांकः** जाक्र/बांवि-२/ता.शा.१/१२९४/२०२३, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२३.
३) **मा. व्यय अग्रक्रम समितीचे** दिनांक ३ जुलै, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना -

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ येथील पत्रान्वये, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. ग्राम विकास विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक २९ मार्च , २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान इमारत बांधकामाच्या रू.४५९.८३ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील इमारतीच्या मूळ अंदजपत्रक तयार करताना मुळ मंजुर आराखडा हा अधिक दोन मजले (G+२) असा होता. प्रस्तुत इमारत बांधकामाच्या मुळ अंदाजपत्रकात पार्किंग फ्लोअरचा समावेश नसल्याने पंचायत समिती, परळी (जि. बीड), येथील सर्व अधिकारी व कर्मचारी यांच्या आग्रही मागणीच्या अनुषंगाने पार्कींग फ्लोअरचा समावेश करण्यात आल्याने कामाच्या किंमतीत वाढ होत

आहे. मुळ अंदाजपत्रकामध्ये भाव दरवाढ अंतर्भूत नसल्याने भाव दरवाढीचा समावेश झाल्यामुळे कामाच्या किंमतीमध्ये वाढ होत आहे. तसेच मुळ अंदाजपत्रकामध्ये वस्तू व सेवा कर अंतर्भूत नसल्याने १८ % वस्तू व सेवा कराचा समावेश झाल्यामुळे मुळ अंदाजपत्रकातील बाबींमध्ये वाढ झाली आहे. यास्तव, अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान इमारत बांधकामाच्या रू.१११०.९७ लक्ष इतक्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केलेली आहे.

०३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मा. व्यय अग्रक्रम समितीने केलेल्या छाननी अंती, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान बांधकामाच्या रूपये ५६८.३८ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

पंचायत समिती, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान बांधकामाच्या मुळ प्रशासकीय मान्यता रू.४५९.८३ लक्ष रकमेमध्ये रू.१०८.५५ लक्ष इतकी वाढ करून रू.५६८.३८ लक्ष (अक्षरी रु. पाच कोटी अडुसष्ट लक्ष अडोतीस हजार मात्र) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास, या शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. पंचायत समिती, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान बांधकामाच्या मुळ प्रशासकीय व सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकाचा तुलनात्मक गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| General Abstract For Construction of Parali P. S. Residential Quarters Revise A. A. (Dist. Beed) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **As per A. A. (In Rs.)** | **As per Revise (In Rs.)** | **Saving (In Rs.)** | **Excess (In Rs.)** |
| ***1*** | ***2*** | ***3*** | ***4*** | ***5*** | ***6*** |
| 1 | Cost of Quarter (20 Nos) | 34439153.00 | 40542830.00 | 0.00 | 6103677.00 |
| 2 | Add 4 % Contingencies | 1377566.00 | 1719204.00 | 0.00 | 341638.00 |
| 3 | Add 2 % For W. C. Estt. | 688763.00 | 0.00 | 688763.00 | 0.00 |
| 4 | Add 8 % For Electrification | 2755132.00 | 2755132.00 | 0.00 | 0.00 |
| 5 | Add 8 % Watewr Supply Arrangement | 1721958.00 | 0.00 | 1721958.00 | 0.00 |
| 6 | Add for Compound wall | 3000000.00 | 1293800.00 | 1706200.00 | 0.00 |
| 7 | Add for Internal Road & Drain | 2000000.00 | 1143454.00 | 856546.00 | 0.00 |
| 8 | Price Escalation | 0.00 | 4226000.00 | 0.00 | 4226000.00 |
| 9 | GST (12%) | 0.00 | 5157610.00 | 0.00 | 5157610.00 |

| General Abstract For Construction of Parali P. S. Residential Quarters Revise A. A. (Dist. Beed) | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **As per A. A. (In Rs.)** | **As per Revise (In Rs.)** | **Saving (In Rs.)** | **Excess (In Rs.)** |
| **Total** | | **45982572.00** | **56838030.00** | **4973467.00** | **15828925.00** |
| **Additional Ammount (Total Column 6- Total Column 5)** | | | | | **10855458.00** |
| **Total** | | **45982572.00** | **56838030.00** | | **(२३.६१ % वाढ)** |

०३. वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-तीन, अनुच्छेद क्र.६ (२७अ) नुसार सुधारीत अंदाजपत्रकातील अधिक्य सुरुवातीस मंजुर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५ % पेक्षा अधिक्याचा (२३.६१%) असल्याने सदर प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार, पंचायत समिती, पंचायत समिती, परळी (जि. बीड) येथील अधिकारी व कर्मचारी यांच्यासाठी शासकीय निवासस्थान बांधकामाच्या रु.५६८.३८ लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

- सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेतच काम पूर्ण करण्याची दक्षता विभागाने घ्यावी.
- योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपद्धती अनुसरणे, आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या अनुषंगाने दिलेल्या निदेशांचे व त्रुटींची पुर्तता करणे याची सर्वस्वी जबाबदारी विभागाची राहील.
- सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रीय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी विभागाची राहील.
- अस्तित्वातील प्रशासकीय मान्यतेच्या / सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या किमंतीच्या मर्यादेत प्रत्यक्ष खर्च होणे अभिप्रेत असून, प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने सुधारणा झाल्याशिवाय वाढीव खर्चाचे अधिकार मिळत नाहीत. तसेच, भविष्यात अशा प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीपेक्षा जास्त निधी वितरीत केला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

०४. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो

उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारत बांधण्यासाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (२५१५ १२५६)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**०५.** प्रस्तुतचा शासन निर्णय व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक ३ जुलै, २०२४ रोजी पार पडलेल्या बैठकीबाबत वित्त विभागाच्या उक्त वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक ११ जुलै, २०२४ अन्वये निर्गमित केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१९१५४८५३८४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.08.19 16:53:37 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) प्र.स. (ग्रा.वि. व पं.रा.), मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र -२, नागपूर.
५) विभागीय आयुक्त कार्यालय, बीड विभाग, बीड.
६) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
९) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
१०) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
११) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, बीड.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा बीड.
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.

१४) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, छत्रपती सभाजीनगर विभाग, छत्रपती सभाजीनगर.

१५) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, बीड.

१६) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.

१७) नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई.

१८) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.

१९) कार्यासन वित्त-१ व योजना-७, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०) सभापती, पंचायत समिती, परळी (जि. बीड).

२१) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, परळी (जि. बीड).

२२) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.